शासकीय आश्रमशाळांमध्ये आदिम
जमातींच्या मुलांना प्रवेश देण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन परिपत्रक क्र संकीर्ण १०९८/प्र.क्र १२/का. १३
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ७ सप्टेंबर, १९९८

वाचा :- १] शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक एएससी १०९२/ प्र.क्र ३०११/का. १३/प्र.क्र १५९३/का. ११ दिनांक २.१.१९९३
२] शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग क्रमांक एएससी-१०९२/ प्र.क्र ३०११/का. १३, दिनांक २०.३.९३

## परिपत्रक

राज्यातील शासकीय आश्रमशाळांमध्ये अनुसूचित जमातीच्या मुलांना प्रवेश देण्याचे धोरण प्रस्तावनेतील दिनांक २.१.९३ व दि. २०.३.९३ च्या शासन निर्णयान्वये ठरविण्यात आले आहे. त्यानुसार शासकीय आश्रमशाळेतील प्रत्येक वर्गात ४० अनुसूचित जमातीच्या [आदिम जमातीसह] विद्यार्थ्यांना निवासी विद्यार्थी म्हणून प्रवेश देण्यात येतो. परंतु अतिमागास असलेल्या आदिम जमातींच्या [कातकरी, कोलाम, व्हडा माडीया] विद्यार्थ्यांचे प्रवेशाचे प्रमाण कमी असते असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. राज्यातील ठाणे, रायगड, पुणे, यवतमाळ व गडचिरोली जिल्हयात कातकरी, कोलाम, व्हडा माडीया या आदिम जमातीची लोकसंख्या मोठ्या प्रमाणात आहे. सदर जमाती या अतिमागास असून त्यांना जलद गतीने विकास व्हावा म्हणून शासनाने प्राधान्याने व स्वतंत्रपणे विविध योजना हाती घेतल्या आहेत. शासकीय आश्रमशाळांमध्ये वरील आदिम जमातीच्या विद्यार्थ्यांचे प्रवेशाचे प्रमाण वाढविल्यास जास्तीत जास्त विद्यार्थ्यांना शिक्षण घेता येईल.

२. वरील सर्व बाबी विचारात घेऊन राज्यातील ठाणे, रायगड, पुणे, यवतमाळ व गडचिरोली या जिल्हयातील कातकरी, कोलाम व व्हडा माडीया या आदिम जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी शासकीय आश्रमशाळांमध्ये प्रवेशासाठी स्वतंत्र वाढीव आरक्षण ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. याबाबींचा विचार करुन शासन ठाणे, रायगड, पुणे, यवतमाळ व गडचिरोली या जिल्हयातील कातकरी, कोलाम व व्हडा माडीया या आदिम जमातीच्या विद्यार्थ्यांना शासकीय आश्रमशाळांमध्ये प्रवेशासाठी आरक्षण ठेवण्याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देत आहे:-

| अ.क्र | आदिम जातीचे नांव | जिल्हा | प्रत्येक वर्गात मंजूर विद्यार्थी संख्येच्या प्रमाणानुसार आरक्षित जागांची टक्केवारी |
|---|---|---|---|
| १] | कातकरी | १] ठाणे | ०८ टक्के [ ३ विद्यार्थी ] |
| | | २] रायगड | ३० टक्के[ १२ विद्यार्थी ] |
| | | ३] पुणे | ०६ टक्के [ २ विद्यार्थी ] |
| २] | कोलाम | यवतमाळ | २० टक्के [ ८ विद्यार्थी ] |
| ३] | बडा माडिया | गडचिरोली | ३० टक्के [ १२ विद्यार्थी ] |

४. सन १९९८-९९ या शैक्षणिक वर्षापासून उपरोक्त आरक्षणाच्या टक्केवारीनुसार संबंधीत जिल्ह्यातील शासकीय आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळांमधील प्रत्येक वर्गात मंजूर विद्यार्थी संख्येच्या प्रमाणात कातकरी, कोलाम व बडा माडिया या आदिम जमातींच्या विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात यावा. सदर परिपत्रक संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील संबंधित शासकीय आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळा यांच्या मुख्याध्यापकांच्या नजरेस आणावे व त्यानुसार प्रवेश देण्याची कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

दि वा जोशी

[ दि. वा. जोशी ]

कक्ष अधिकारी

प्रति,

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
शिक्षण संचालक, पुणे.
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, समाजकल्याण, पुणे.
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
जिल्हाधिकारी, तथा पदसिध्द अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/रायगड/पुणे/यवतमाळ/गडचिरोली
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा पदसिध्द अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/रायगड/पुणे/यवतमाळ/गडचिरोली

शिक्षणाधिकारी, [ प्राथमिक/माध्यमिक] जिल्हा परिषद ठाणे/रायगड/पुणे/
यवतमाळ/गडचिरोली
कक्ष अधिकारी, का. ११/का. १२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
आदिवासी विकास विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती, का. १३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.